**पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या आस्थापनेवरील माऊन्टेड पोलीस घटकाकरिता येणा-या सुधारित आवर्ती व अनावर्ती खर्चास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एपीओ-३११८/प्र.क्र.१३२/पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई.
दिनांक : २६ जुलै, २०२४.

वाचा :-

१) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई कार्यालयाचे पत्र जा.क्र.६८०/पोआ/कावसु/परि-७/२०१८, दि.०६.११.२०१८.
२) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक : एपीओ-३११८/प्र.क्र.१३२/पोल-३, दि.२८.०२.२०१९.
३) शासन शुद्धिपत्रक, गृह विभाग, क्रमांक : एपीओ-३१२०/प्र.क्र.५४/पोल-३, दि.२५.०५.२०२१.
४) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई कार्यालयाचे पत्र क्र.पोआ/कक्ष-२(३)/ र. व.का. / सुसंमे/१३२/२०२३, दि.२८.०८.२०२३.
५) राज्य मंत्रिमंडळाच्या दिनांक ०५.०७.२०२४ रोजी झालेल्या बैठकीचे कार्यवृत्त दि.०८.०७.२०२४

प्रस्तावना :-

कायदा व सुव्यवस्था परिस्थिती हाताळण्यासाठी पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या आस्थापनेवर संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयाद्वारे ३० अश्वांसह माऊन्टेड पोलीस घटक हा नवीन घटक निर्माण करण्यास आवर्ती व अनावर्ती खर्चासह मान्यता देण्यात आली.

संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयानुसार मान्यता दिलेला आवर्ती व अनावर्ती खर्च निश्चित करताना Manual for Mounted Police Units, सरदार वल्लभभाई पटेल राष्ट्रीय पोलीस अकादमी हैद्राबाद, कोलकाता माऊन्टेड पोलीस युनिट, मुंबई रेस कोर्स यांच्याकडून माहिती घेऊन दर निश्चित करण्यात आले होते. या प्रस्तावामध्ये माऊन्टेड

घटकाकरिता आवश्यक त्या सर्व बाबींचा समावेश करण्यात आलेला नव्हता. तसेच उक्त दर हे २०१८ च्या दरानुसार परिगणित करण्यात आले होते व त्यामध्ये वार्षिक वाढ विचारात घेण्यात आली नव्हती. म्हणून मंजूर आवर्ती व अनावर्ती खर्च अपुरा पडत आहे. त्यामुळे उक्त घटकासाठी सुधारित आवर्ती व अनावर्ती खर्च मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

**शासन निर्णय**:-

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या आस्थापनेवरील माऊन्टेड पोलीस घटकाकरिता रु.१,८८,८५,५१०/- (रुपये एक कोटी अठ्ठयाऐंशी लाख पंच्याऐंशी हजार पाचशे दहा फक्त) इतक्या सुधारित आवर्ती व रु.३६,५३,१३,०००/- (रुपये छत्तीस कोटी त्रेपन्न लाख तेरा हजार फक्त) इतक्या सुधारित अनावर्ती खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

२. उक्त प्रमाणे मान्यता देण्यात आलेल्या आवर्ती खर्चाचे सविस्तर विवरण शासन निर्णयासोबतच्या **"परिशिष्ट-अ"** प्रमाणे व अनावर्ती खर्चाचे सविस्तर विवरण **"परिशिष्ट-ब"** प्रमाणे आहे.

३. उक्त प्रमाणे होणारा खर्च " गृह विभाग-मागणी क्र.बी-१,२०५५, पोलीस ००, १०८ राज्य मुख्यालय पोलीस (०२)(०१) शहर पोलीस आस्थापना (दत्तमत)(अनिवार्य)(२०५५००९७), ५० इतर खर्च" या लेखाशीर्षाखाली उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

४. उक्त शासन निर्णय हा मा. मंत्रिमंडळाच्या दि.०५.०७.२०२४ रोजी झालेल्या बैठकीतील मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७२६१६१४५६६७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA T BHALWANE

Digitally signed by RAJENDRA T BHALWANE
Date: 2024.07.26 16:29:28 +05'30'

**( रा. ता. भालवणे )**
**उप सचिव, गृह विभाग**

प्रत,

मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
अपर मुख्य सचिव (सेवा), साप्रवि, मंत्रालय, मुंबई.
अपर मुख्य सचिव (वित्त),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
अपर पोलीस आयुक्त, सशस्त्र पोलीस दल, मुंबई.
पोलीस उपायुक्त, सशस्त्र पोलीस, मरोळ, मुंबई.
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
उप सचिव(पोल ३),गृह विभाग,मंत्रालय,मुंबई.
उप सचिव(अर्थसं-१),गृह विभाग,मंत्रालय,मुंबई.
वित्त विभाग (व्यय-७)/वित्तिय सुधारणा-१/आ.पु.क.
निवड नस्ती, पोल-३.

शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक : एपीओ-३११८/प्र.क्र.१३२/पोल-३,
दिनांक २६ जुलै, २०२४ चे सहपत्र.

## "परिशिष्ट-अ"
## आवर्ती खर्चाचा तपशील

| **अ.क्र.** | **खर्चाची बाब** | **रक्कम** |
|---|---|---|
| १ | ३० अश्वांचा खाद्यखर्च | रु.८०,५६,८००/- |
| २ | ३० अश्वांची वैद्यकीय तपासणी | रु.१२,००,०००/- |
| | ३० अश्वांचा औषध खर्च | रु.५,४०,०००/- |
| | ३० अश्वांचे लसीकरण व मोठा खर्च | रु.१,५०,०००/- |
| | अश्व शारीरिक (रक्त) तपासणी | रु.१,२०,०००/- |
| | अश्व दात तपासणी | रु.२,४०,०००/- |
| ३ | ३० अश्वांची साफसफाई, अंघोळ इ. खर्च | रु.४,७९,४००/- |
| ४ | ३० अश्वांकरिता प्रशिक्षकांचे वेतन | रु.९,००,०००/- |
| ५ | साईस यांचे वेतन | रु.३६,००,०००/- |
| ६ | अश्वांची नालबंदी | रु.५,४०,०००/- |
| ७ | स्टेबल मेन्टेनन्स | रु.७,२०,०००/- |
| ८ | आकस्मिक निधी (प्रती वर्षी) | रु.६,००,०००/- |
| ९ | सॅडलेरी मेंटेनन्स/ग्रुमींग किट | रु.२,४०,०००/- |
| १० | खाद्यची वाहतुक | रु.२,४०,०००/- |
| ११ | टाकाऊ पदार्थाची विल्हेवाट | रु.३,६०,०००/- |
| | आवर्ती खर्च (वार्षिक) | रु.१,७९,८६,२००/- |
| | वार्षिक ५ % वाढीव खर्च (वार्षिक) | रु.८,९९,३१०/- |
| | **एकूण आवर्ती खर्च** | **रु.१,८८,८५,५१०/-** |

*****

शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक : एपीओ-३११८/प्र.क्र.१३२/पोल-३,
दिनांक २६ जुलै, २०२४ चे सहपत्र.

## "परिशिष्ट-ब"
## अनावर्ती खर्चाचा तपशील.

| अ.क्र. | खर्चाची बाब | रक्कम |
|---|---|---|
| १ | कायमस्वरुपी तबेला बांधण्याकरिता खर्च | रु.३४,००,००,०००/- |
| २ | ३० अश्व खरेदी | रु.१,२०,००,०००/- |
| ३ | ३० अश्वांसाठी साहित्य (सॅडलेरी)- (मुदत १ ते ५ वर्ष) | रु.१८,००,०००/- |
| ४ | अश्वांचे इतर साहित्य (कुटी मशीन, गिरण, पातीले इत्यादी) (मुदत १ ते ५ वर्ष) | रु.४,००,०००/- |
| ५ | स्पोर्टस साहित्य (मुदत ५ वर्ष) | रु.१८,५०,०००/- |
| ६ | सेरोमोनिअल युनिफॉर्म (मुदत ५ वर्ष) | रु.१२,००,०००/- |
| ७ | अश्वांची वाहतुक खर्च | रु.६,००,०००/- |
| ८ | प्रशिक्षण | रु.३,००,०००/- |
| | एकूण अनावर्ती खर्च | रु.३५,८१,५०,०००/- |
| | २ % वाढीव खर्च (वार्षिक) | रु.७१,६३,०००/- |
| | **एकूण अनावर्ती खर्च** | **रु.३६,५३,१३,०००/-** |

*****